शोध व बचाव साहित्य खरेदी करण्यासाठी तांत्रिक समितीची स्थापना करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**(आपत्ती व्यवस्थापन,मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक:- आव्यप्र-२०२२/प्र.क्र.६१/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २८ मार्च, २०२२.

**प्रस्तावना:-**

आपत्तीचा प्रभावी मुकाबला आणि व्यवस्थापन करण्यासाठी राज्यात असलेल्या प्रतिसाद यंत्रणा या सर्व अत्याधुनिक साधनसामुग्रीने सुसज्ज असणे आवश्यक आहे. यामुळे आपत्तीमुळे होणारी जिवित व वित्त हानी कमी करणे शक्य होईल. त्यासाठी सर्व प्रतिसाद यंत्रणांकडे सद्या जगभरात उपलब्ध असलेली अत्याधुनिक साधनसामुग्री उपलब्ध करणे गरजेचे झाले असल्याने सदर साधनसामुग्रीची आवश्यकता, उपयोग याबाबत मागदर्शन करण्यासाठी तांत्रिक समितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आपत्तीमुळे होणारी जिवित व वित्त हानी कमी करण्यासाठी राज्यातील सर्व प्रतिसाद यंत्रणांकडे अत्याधुनिक साधनसामुग्री उपलब्ध असणे आवश्यक असल्याने सध्या जगभर उपलब्ध असलेल्या साधनसामुग्रीची आवश्यकता उपयोग याबाबत मागदर्शन करण्यासाठी खालीलप्रमाणे तांत्रिक समिती स्थापित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| | |
|---|---|
| संचालक , महाराष्ट्र अग्निशमन सेवा | अध्यक्ष |
| संचालक, नॅशनल फायर सर्व्हिस कॉलेज, नागपूर | सदस्य |
| सहाय्यक संचालक, नॅशनल फायर सर्व्हिस कॉलेज, नागपूर | सदस्य |
| विशेष कार्य अधिकारी (तांत्रिक), मुंबई अग्निशमन दल | सदस्य |
| मुख्य अग्निशमन अधिकारी, पीएमआरडीए, पुणे | सदस्य |
| मुख्य अग्निशमन अधिकारी, नागपूर महानगर पालिका | सदस्य |
| राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दलाचे प्रतिनिधी | सदस्य |
| राज्य आपत्ती प्रतिसाद दलाचे प्रतिनिधी | सदस्य |

वरील समितीकडून जिल्ह्यांकडून आणि तसेच बाहय यंत्रणेकडून शोध व बचाव साहित्य खरेदी करण्यासाठी प्राप्त होणा-या प्रस्तावाची छाननी करुन सदर साधनसामुग्रीची आवश्यकता आणि उपयोग याबाबत विभागास शिफारस करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४०५१६५७१०७९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(हितेंद्र दुफारे)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत:-

संचालक , महाराष्ट्र अग्निशमन सेवा
संचालक, नॅशनल फायर सर्व्हिस कॉलेज, नागपूर
सहाय्यक संचालक, नॅशनल फायर सर्व्हिस कॉलेज, नागपूर
विशेष कार्य अधिकारी (तांत्रिक), मुंबई अग्निशमन दल
मुख्य अग्निशमन अधिकारी, पीएमआरडीए, पुणे
मुख्य अग्निशमन अधिकारी, नागपूर महानगर पालिका
कमांडण्ट, राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दल, संदुबरे, पुणे
अपर पोलीस महासंचालक, राज्य आपत्ती प्रतिसाद दल, मुंबई.